आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ करीता जिल्हा परिषदांना शैक्षणिक फी, परिक्षा फी,परिरक्षण व शिष्यवृत्ती इ. साठी सहाय्यक अनुदाने या योजनेकरीता निधी वितरण (लेखाशिर्ष २२२५ एफ १३८)

# महाराष्ट्र शासन

## आदिवासी विकास विभाग

## शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२१ / प्र.क्र.६/ कार्यासन.६

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

दिनांक :- ३१ मार्च,२०२२.

**वाचा -**

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१, दि.१४.१०.२०२१, दि.२८.०१.२०२२, दि.१७.०३.२०२२.

२) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, समक्रमांक, दि.२०.१२.२०२१.

३) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाची नस्ती क्र.बीसीएच-२०२१/ प्र.क्र.२१/ शिक्षण-२.

**प्रस्तावना:-**

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या अधिनस्त अनुदानित वसतीगृहांमधील प्रवेशित अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक फी, परिक्षा फी, परिरक्षण व शिष्यवृत्ती यांकरीता सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागास जिल्हा परिषदांना शैक्षणिक फी, परिक्षा फी,परिरक्षण व शिष्यवृत्ती इ. साठी सहाय्यक अनुदाने या योजनेखाली तरतूद अर्थसंकल्पित करण्यात येते. या अनुषंगाने सन २०२१-२२ या वर्षात सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागास संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये रू.१००.०० लाख इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. आता सं.क्र.३ येथील नस्तीवर वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरून निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या अधिनस्त अनुदानित वसतीगृहांमधील प्रवेशित अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक फी, परिक्षा फी, परिरक्षण व शिष्यवृत्ती यांकरीता आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र.टी-५ मधील २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण या मुख्य शीर्षाखालील जिल्हा परिषदांना शैक्षणिक फी, परिक्षा फी,परिरक्षण व शिष्यवृत्ती इ. साठी सहाय्यक अनुदाने या योजनेखाली सुधारीत अंदाजात मान्य झाल्याप्रमाणे खालीलप्रमाणे उर्वरीत निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर (BEAMS ) वितरीत करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

(रू.लाख)

| योजनेचे नांव/ लेखाशिर्ष | बाब/उद्दिष्ट | सन २०२०-२१ सुधारीत अंदाज | सदर शासन निर्णयाद्वारे वितरीत करण्यात येत असलेली तरतूद |
|---|---|---|---|
| (०१)(७४) जिल्हा परिषदांना शैक्षणिक फी, परिक्षा फी,परिरक्षण व शिष्यवृत्ती इ. साठी सहाय्यक अनुदाने (२२२५ एफ १३८) | ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) | १५०.०० | ५०.०० |

२. उपरोक्तप्रमाणे रू.५०.०० लाख (अक्षरी रूपये पन्नास लाख फक्त) इतका निधी अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पद्धतीने काटकसरीच्या उपाय योजना करुन खर्च करावा. उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून नियंत्रक अधिकारी यांनी झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टांबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

३. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना विभागप्रमुख तसेच नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तिय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ येथील शासन आदेशान्वये दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे. विभाग प्रमुख/ नियंत्रण अधिकारी यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी घटक कार्यक्रम क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतुन फक्त अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांनाच लाभ देण्यात येईल याची दक्षता घ्यावी.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधिन क्र.१ येथील शासन आदेशान्वये प्रशासकिय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात आणि अनौ.सं.क्र.४७२/व्यय-१४,दि.३०.०३.२०२२ अन्वये दर्शविलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३३११६३४३०६५२४ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAVINDRA D AUTE

Digitally signed by RAVINDRA D AUTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108,
pseudonym=C4ECFFC229308BD3BD1E334FAC78848FBF7F7613,
serialNumber=CA98EFAC317508AB9B5820B47955BC1BABB173F20D25ABD816ED91A9B6B0F16C, cn=RAVINDRA D AUTE
Date: 2022.04.04 13:42:19 +05'30'

**(रविंद्र दि. औटे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव.
२. मा.राज्यमंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव.
३. प्रधान सचिव,सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य,पुणे

५. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
६. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
७. सर्व प्रकल्प, अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प
८. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९ ), मंत्रालय, मुंबई.
९. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
१०. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
११. कार्यासन क्र.१२/ निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.